**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील सैनिक शाळा, सातारा व चंद्रपूर या सैनिक शाळेतील विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सासैशा-२०२१/प्र.क्र.१०१/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय , मुंबई- ३२.
दिनांक : १६ मार्च, २०२२

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक ०३/०२/२०२२
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),संचालनालय,पुणे यांचे क्र.सासैशाशि/ २०१९-२०/माध्य-ब/६६८/एस-५/९६९, दिनांक ९/३/२०२१ रोजीचे पत्र.
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र.१०१/एसएम-६, दिनांक ११/०१/२०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या धोरणानुसार सातारा सैनिकी शाळा व चंद्रपूर सैनिक शाळा या दोन सैनिकी शाळांची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्रातील तळागाळातील व सर्व स्तरावरील गरीब व होतकरू मुलांना राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीच्या माध्यमातून भारतातून सैन्य दलात अधिकारी पदावर संधी मिळावी, हा या शाळांचा मुख्य उद्देश आहे.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये सैनिक शाळा, सातारा व चंद्रपूर येथील विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरिता रु. ६४,४१,५७५/- इतका निधी वितरीत करण्याची मागणी शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये केली आहे. विभागाच्या अर्थसंकल्पात मागणी क्र. ई-२,२२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली रु. ४८,५१,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध असुन या अर्थसंकल्पीय तरतुदीमधुन वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भ क्र.(५) येथील शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ७५% म्हणजेच रु. ३६,३८,२५०/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित २५% निधी वितरणासाठी वित्त विभागाकडे प्रस्ताव सादर केला असता, वित्त विभागाने उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ८५% म्हणजेच रु. ४१,२३,३५०/- या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिली असून संदर्भ क्र.(५) अन्वये वितरीत केलेला ७५% निधी वजा जाता उर्वरित १०% म्हणजेच रु. ४,८५,१००/- इतका निधी सातारा सैनिकी शाळा व चंद्रपूर सैनिकी शाळा येथील विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती प्रयोजनार्थ वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता सातारा व चंद्रपूर सैनिकी शाळा यांनी शिष्यवृत्तीसाठी केलेल्या रकमेची मागणी विचारात घेऊन उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीमधून सातारा सैनिकी शाळेस रु. २,४२,५५०/- व चंद्रपूर सैनिकी शाळेस रु. २,४२,५५०/- याप्रमाणे एकूण रु.४,८५,१००/- ( रुपये चार लाख पंच्याऐंशी हजार शंभर फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतने" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा व शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे वित्तीय नियमावली व कार्यपध्दतीचे तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ३.०२.२०२२ मध्ये नमूद आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२१/२०२२/व्यय-५, दि. २३/०२/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१६१८२५०१०२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.03.16 18:36:36 +05'30'

**( समीर सावंत )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
५. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे

९. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सातारा.
१०.शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, चंद्रपूर
११.महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
१२.प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
१५.वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१६.प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१७.प्राचार्य, सैनिकी स्कूल, चंद्रपूर
१८. सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१९.मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
२०.वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
२१.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवडनस्ती (एसएम-६)